# एलिजा गुलामची कहाणी

## एक यहूदी किंवदंती



पुनर्कथन:
इसहाक बाशेविस सिंगर

मराठी : अश्विनी बर्वे



# एलिजा गुलामची कहाणी

## एक यहूदी किंवदंती

पुनर्कथन: इसहाक बाशेविस सिंगर, मराठी : अश्विनी बर्वे

प्राचीन काळी, दूर देशात एक मोठं शहर होतं. जिथं खूप श्रीमंत लोक राहत होते. त्यात छान महाल, मोठे रस्ते, बागा होत्या.





त्यातच तुटलेल्या - फुटलेल्या घरांची छोटी गल्ली होती. त्यात अरुंद खिडक्या आणि दरवाजे होते, आणि त्यांची छतं गळकी होती. या गरीब वस्तीत एक पवित्र व्यक्ती राहत होती. त्याचे नाव टोबियास होते, आणि त्याच्या पत्नीचे नाव पनिना होते. त्यांना पाच मुलं होती, तीन मुलगे आणि दोन मुली.

टोबियास एक लिपिक होते जे पवित्र धार्मिक ग्रंथांची प्रत तयार करण्याचे काम करत असत. अशाप्रकारे ते मोठ्या गरिबीत आपल्या परिवाराची उपजिविका भागवत असत.

पण अचानक ते आजारी पडले आणि त्यांच्या उजव्या हाताने काम करणं बंद केलं. लवकरच घरात अन्नाची कमतरता भासू लागली. कोठ्या एवढ्या रिकाम्या होत्या की त्यातून उंदीर सुद्धा निघून गेले. मांजरांना पकडण्यासाठी काहीच राहिले नाही. बूट नसल्याने टोबियासची मुलं शाळेत जाऊ शकली नाहीत. टोबियासचे कपड़े जुने फाटके होते.

शेजाऱ्यांनी परिवाराची दयनीय अवस्था बघितली तेव्हा त्यांनी मदत करण्याचा प्रयत्न केला. पण टोबियासने त्यांचे प्रस्ताव स्वीकारले नाहीत आणि म्हटलं, "बघा एक ईश्वर आहे आणि तोच आम्हांला जरूर मदत करेल."



एक दिवस टोबियासच्या पत्नीने त्याला म्हटलं: “जर देवाला आपल्याला मदत करायची असेल, तर ती मदत त्याने लवकर करायला हवी. देव जे काही करेल ते करो, पण तुम्ही घरी राहिल्याने परिस्थितीत सुधारणा होणार नाही. तुम्हांला शहरात जावं लागेल. देवाच्या चमत्काराची वाट बघतांना सुद्धा आपल्याला आपले प्रयत्न करावेच लागतील. जर माणसाने प्रथम काम सुरु केले तर मग देव त्याला मदत करतो.”

“बघ ना, माझ्याजवळ घालायला कपडे सुद्धा नाहीत, मग मी लोकांना आपला चेहरा कसा दाखवू शकतो?”

“थांबा, पतीदेव, कपड्यांचे मी बघते.”

मग पनिना एका शेजाऱ्याकडे गेली आणि तिने त्यांच्याकडून एक कोट, एक टोपी आणि बूट उसने घेऊन आली. तिने टोबियासला कपडे घालण्यासाठी मदत केली. मग टोबियास वास्तवात एका नवीन माणसा सारखा दिसू लागला. “आता जा,” पनिना म्हणाली, “तुमचे भाग्य उजाडो.” जेव्हा पती गेले, तेव्हा पनिनाने मुलांना प्रार्थना करायला सांगितली, ज्यामुळे त्यांचे वडील रिकाम्या हाताने घरी परत येणार नाही.



जसा टोबियास शहराच्या मधोमध पोहचला, तेव्हा एका अनोळखी माणसाने रोखलं. तो उंच होता आणि त्याची दाढी पांढरी होती.त्याने एक लांब कोट घातला होता आणि त्याच्या हातात एक छडी होती. “तुला शांतता मिळो, टोबियास," तो म्हणाला, त्याने आपला हात पुढे केला. टोबियास, विसरून गेला होता की तो आपला उजवा हात हलवू शकत नाही. पण जेव्हा अनोळखी व्यक्तीने त्याचा हात पकडून त्यावर थोपटलं तेव्हा टोबियास आपल्या हातात चमत्कारिक सुधारणा पाहून तो चकित झाला.





“मी कोणाला अभिवादन करत आहे? " टोबियासने विचारलं.

“माझं नाव एलिजा आहे आणि मी आपला गुलाम आहे.”

"गुलाम?" टोबियासने हैराण होऊन विचारलं.

“हो, आपला गुलाम. मला स्वर्गातून पाठवलं आहे. मला बाजारात घेऊन चला आणि सगळ्यात जास्त बोली लावणाऱ्या व्यक्तीला मला विकून टाका.”

“जर तुम्ही स्वर्गातून आले आहत तर मग मी तुमचा गुलाम आहे,” टोबियासने उत्तर दिलं. "एक गुलाम आपल्या मालकाला कसं विकू शकतो?”

एलिजाने उत्तर दिलं, “मी म्हणतो तसं करा.”

खरंतर एलिजा परमेश्वराचा दूत होता. म्हणून टोबियासकडे आज्ञा पाळण्याशिवाय कोणता पर्याय नव्हता.



बाजारात टोबियास आणि एलिजाजवळ खूप श्रीमंत व्यापारी जमा झाले. इतका प्रामाणिक आणि हुशार दिसणारा गुलाम विक्रीसाठी बाजारात याआधी कधीच आला नव्हता.

व्यापाऱ्यामध्ये सगळ्यात श्रीमंत माणसाने पुढे येऊन एलिजाला संबोधित केलं. “तू काय करू शकतो,गुलामा?”

“तुम्ही म्हणाल ते,” एलिजा म्हणाला.

“तू महाल बांधू शकतो का?”

“सगळ्यात सुंदर महाल जो तुम्ही कधी बघितला आहे.”

"राजाच्या महालापेक्षा जास्त सुंदर?”

“त्याच्या पेक्षा जास्त सुंदर आणि भव्य.”

"पण आम्ही तुझ्यावर कसा विश्वास करणार? त्यांच्यातल्या एका व्यापाऱ्याने विचारले.

एलिजाने आपल्या खिशातून लाकडाच्या ठोकळ्यांची पिशवी काढली आणि त्याने एक छोटा महाल तयार केला. त्याने ते इतक्या वेगाने केले आणि त्या महालाचे सौंदर्य असामान्य होते की सगळे व्यापारी चकित झाले.

“तू अशाप्रकारे खरा महाल बांधू शकतो का?” सगळ्यात श्रीमंत व्यापाऱ्याने विचारले.

“यापेक्षाही उत्तम,” एलिजा म्हणाला.

व्यापाऱ्यांना असं वाटलं की त्या गुलामाजवळ काही अलौकिक शक्ती होती. मग ते त्वरित बोलू लागले. “दहा हजार गुलडेन!" एक ओरडला.

"पन्नास हजार!“ दूसरे व्यापारी म्हणाले.

"एक लाख!" तिसरा म्हणाला.

सगळ्यात अधिक किंमत – आठ लाख गुलडेन – शेवटी सगळ्यात श्रीमंत व्यापाऱ्यांने बोली लावली आणि त्याने त्वरित टोबियासला ते पैसे दिले.





एलिजाकडे बघत, व्यापारी म्हणाला, “जर खरा महाल तितकाच सुंदर बांधला जसे तू म्हटलं आहे, तर मग मी तुला गुलामीतून मुक्त करून स्वतंत्र करेन.”

“खूप छान,” एलिजाने उत्तर दिलं. मग त्याने टोबियासला म्हटलं, “आता घरी जाऊन आपली पत्नी आणि मुलांबरोबर आनंदात रहा. आता तुमचे गरिबीचे दिवस संपले.”

परमेश्वराची स्तुती करत आणि एलिजाला त्याच्या चांगुलपणासाठी धन्यवाद दिल्यावर, टोबियास घरी परत आला.

त्याची पत्नी आणि मुलांचा आनंदाला पारावर राहिला नाही.

नेहमीप्रमाणे, टोबियासने त्या पैशांतला दाहवा हिस्सा गरिबांना दान केला. आता भला तो एक श्रीमंत माणूस असेल, पण त्याने एका लिपिकाच्या रुपात आपल्या आवडते काम करण्याचे ठरवले..

रात्र झाली आणि एलिजाने परमेश्वराला म्हटले, “मी आपल्या भक्ताला टोबियासला वाचवण्यासाठी स्वतःला एका गुलामाच्या रुपात विकून टाकले. मी आता आपल्याला प्रार्थना करतो की तुम्ही मला महाल बांधण्यासाठी मदत करा.”



त्वरित स्वर्गातून स्वर्गदूतांचे एक दल उतरले. त्यांनी रात्रभर काम केले. जेव्हा सूर्य उगवला, तेव्हा महालाचे काम समाप्त झाले होते.



श्रीमंत व्यापारी आला आणि त्याने आश्चर्याने पहिले. असा वैभवशाली महाल मानवी डोळ्यांनी आधी कधी पाहिला नव्हता.

“हा आपला महाल आहे,” एलिजा म्हणाला. “तुमचे वचन आठवा आणि मला स्वतंत्र करा.”

"आपण स्वतंत्र आहात, माझे स्वामी," व्यापाऱ्याणे उत्तर दिलं आणि मग त्याने देवाच्या दुताला वाकून नमस्कार केला.



देवदूत हसले.

देवाने सातव्या आसमानातून काहली पाहिलं आणि हसले. स्वर्गदूतांनी आपले पंख पसरले आणि ते एलिजाला बरोबर घेऊन आकाशात वर उडून गेले.



समाप्त